सन २०१८-१९ करीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत प्राप्त निधी वितरणास मान्यता व कार्यारंभ आदेश देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१८/प्र.क्र.६९/का.-१९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०५/११/२०१८

वाचा -

१. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०४/२०१८-Grants, दि.२१/०६/२०१८.
२. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रिय-२०१८/प्र.क्र.६९/का.१९,दि.०७.०६.२०१८ व दि.०४.१०.२०१८
३. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र F.No.११०१५/४(१४)/२०१८- Grant दि.२७.०९.२०१८

प्रस्तावना (Preamble) -

भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) योजनेअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावांच्या अनुषंगाने जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली येथे प्रकल्प मुल्यमापन समितीची (Project Appraisal Committee-PAC) बैठक दि. २३/०५/२०१८ रोजी आयोजित करण्यात आलेली होती. या बैठकीच्या वाचा क्र. १ वरील इतिवृत्तान्वये केंद्र शासनाने एकुण रु. १३८९४.८१ लक्ष निधीच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान केलेली आहे. यापैकी केंद्र शासनाने वितरित केलेला रु. ९७२६.३६ लक्ष निधी वाचा क्र.२ वरील शासन निर्णयान्वये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना पहिल्या हफ्त्याच्या स्वरूपात वितरीत केला आहे.आता केंद्र शासनाच्या वाचा क्र.३ वरील पत्रान्वये प्राप्त रु. ४१६८.४५ लक्ष इतका निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय (Government resolution)-

केंद्र शासनाने सन २०१८-१९ करिता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत मंजूर एकूण रु. १३८९४.८१ लक्ष (रु. एकशे अडोतीस कोटी चौ-याणव लक्ष ऐंक्याएशी हजार फक्त) निधीमधून पुढील कामांकरीता तालिकेतील स्तंभ क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या निधीच्या मर्यादेत रू. ४१६८.४५ लक्ष (रु. एकेचाळीस कोटी अडुसष्ट लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | योजनेचे ठिकाण / योजना राबविणारी यंत्रणा (PO/ATC/संस्था ) | सन २०१८-१९ करीता मंजूर निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात आलेला निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **275 (1) For Year 2018-19** | | | | | |
| 1 | Construction of 2 EMRS, Nandurbar(Dhadgaon) and Pandharkawada (PVTG-Kolam) | Ekalavya Society | 1400.00 | 980.00 | 420.00 |
| 2 | Empowering Tribal Communities to improve nutrition & Strengthening awareness on nutrition related services | Commissionerate | 359.31 | 251.50 | 107.81 |
| | **New Project** | | | | |
| 3 | Recurring cost of 18 EMRSs | Ekalavya Society | 2523.35 | 1766.34 | 757.01 |
| 4 | Establishment of science laboratories in ashram school for 8th to 10th std students | PO- ITDP Solapur, dahanu, Kalwan, Pen/ Commissionerate | 213.00 | 149.10 | 63.90 |
| 5 | Summer/Winter Camps for sports, excursion/study trips and Arts in AS for all PO s | Commissionerate | 517.00 | 361.90 | 155.10 |
| 6 | Solar Energy system and Campus development for Integrated educational campus at MAVESHI Tal. Akole Dist. Ahmadnagar | PO-ITDP Rajur | 80.00 | 56.00 | 24.00 |
| 7 | Upgradation and modernization of Ashram School Kitchens at Thane and Nashik ( 3 lac @ AS for all AS of ATC Thane and Nashik) | Commissionerate | 514.00 | 359.80 | 154.20 |
| 8 | Health care for ashram school and EMRS | Commissionerate /Ameya Life | 561.00 | 392.70 | 168.30 |
| 9 | 3 Centralized Kitchens for Ashram schools @ 4 crore per 5000 students- | PO-ITDP Jawhar, PO -ITDP Nandurbar ,PO-ITDP Ghodegaon /Commissionerate and Stri Shakti | 1200.00 | 840.00 | 360.00 |

| अ.क्र. | योजनेचे नाव | योजनेचे ठिकाण / योजना राबविणारी यंत्रणा (PO/ATC/संस्था ) | सन २०१८-१९ करीता मंजूर निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात आलेला निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| **1** | **2** | **3** | **4** | **5** | 6 |
| 10 | Bore well & overhead Tank on solar energy | PO-ITDP Chandrapur | 25.00 | 17.50 | 07.50 |
| 11 | Nirmala Niketan, College of Home science- indigenous nutrious vegetables (for 5 AS @ 5000 students will benefit) | PO-ITDP Dahanu and Nirmala Niketan, College of Home science | 104.00 | 72.80 | 31.20 |
| 12 | Establishment of milk Collection and cooling Centre (ITDP Ghodegaon) 2 units @20 lac each | PO-ITDP Ghodegaon | 40.00 | 28.00 | 12.00 |
| 13 | Distribution of Kadaknath Hen Hatches (Rs.10,000 per unit *100) | PO-ITDP Solapur | 10.00 | 7.00 | 03.00 |
| 14 | Establishment Hand Pounded Rice unit | PO-ITDP Gadchiroli | 12.75 | 8.93 | 03.82 |
| 15 | Rainwater harvesting in Govt AS | PO-ITDP Kalvan | 51.00 | 35.70 | 15.30 |
| 16 | TISS Model Gram Panchayat (Convergence of development schemes and PESA) in 58 GPs (@6.8L/GP) | Commissionerate and TISS | 608.85 | 426.20 | 182.65 |
| 17 | ICAR Baramati - improving livelihood of tribal farmers through implementation of improved technology interventions in integrated Crops-Livestock-Poultry-Fisheries @Rs.1500 per beneficiary | PO-ITDP Jawhar and ICAR Baramati ,CIFE-Mumbai | 99.00 | 69.30 | 29.70 |
| 18 | GIS mapping for CFR villages Rs 35000 @ per village*37 and Rs 10 Lac for mobile application.(Pilot project) | TRTI | 23.00 | 16.10 | 06.90 |
| 19 | BVG- Agriculture- crop yield (pilot study) for 1000 farmers (Nandurbar & Taloda 500 each ) (@Rs.6960/acre) | PO-ITDP Taloda and PO-ITDP Nandurbar/ATC-Nashik and BVG | 70.00 | 49.00 | 21.00 |

| अ.क्र. | योजनेचे नाव | योजनेचे ठिकाण / योजना राबविणारी यंत्रणा (PO/ATC/संस्था ) | सन २०१८-१९ करीता मंजूर निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात आलेला निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| 20 | BVG- Milk yield improvement ( pilot study) @Rs.2077 per animal*500 animals) | PO-ITDP Nandurbar | 10.38 | 7.27 | 03.11 |
| 21 | Training to tribal Student in paramedical course | PO-ITDP Deori | 21.50 | 15.05 | 06.45 |
| 22 | Theme restaurant for tribal SHGs | PO-ITDP Kalwan | 30.00 | 21.00 | 09.00 |
| 23 | GRANDAGE SERVICES Pvt Ltd.- Elderly care skill development with placement (150 candidates will be trained @ 1L/ Candidate.) | Commissionerate and GRANDAGE SERVICES | 258.00 | 180.60 | 77.40 |
| 24 | IIT Bombay – RuTag - Hirda decortication | PO-ITDP Ghodegaon and IIT Bombay – RuTag | 7.70 | 5.39 | 02.31 |
| 25 | CTARA( Centre for Technology Alternatives for Rural Areas), IIT Bombay - technology Transfer for rural development | Commissionerate and CTARA , IIT Bombay | 39.99 | 27.99 | 12.00 |
| 26 | IIT Bombay – RuTag - cage culture low cost ( For 25 SHGs, 6 cages @ Rs.8.25L per cage) | PO-ITDP Ghodegaon and IIT Bombay – RuTag | 47.80 | 33.46 | 14.34 |
| 27 | MahaTribes -Promotion of market linkages for tribal products and handicrafts through professional management, upgrading design, value addition, branding ,supply chain management and exhibitions /events (year 1 & 2 ) | TRTI | 800.00 | 560.00 | 240.00 |
| 28 | Organizing FPOs of 15000 farmers for processing, distribution, branding and retailing. | TRTI | 2440.00 | 1708.00 | 732.00 |

| अ.क्र. | योजनेचे नाव | योजनेचे ठिकाण / योजना राबविणारी यंत्रणा (PO/ATC/संस्था ) | सन २०१८-१९ करीता मंजूर निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात आलेला निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| 29 | Arrangement of the project office on the basis of Lakhina pattern and other office furniture, computers etc. | PO-ITDP Kinwat | 20.30 | 14.21 | 06.09 |
| 30 | e office implementation with MFU, printers, computers with high speed internet at each table | PO-ITDP Kalwan | 30.00 | 21.00 | 09.00 |
| 31 | Institutional Strengthening for Tribal Dev. Dept. And Field offices (@28 lacs per office) | Commissionerate | 500.00 | 350.00 | 150.00 |
| 32 | Data Analytics Centre in collaboration with Pune University | TRTI and Pune University | 1000.00 | 700.00 | 300.00 |
| 33 | Administrative Structure M&E | Commissionerate | 277.88 | 194.52 | 83.36 |
| **Total** | | | **13894.81** | **9726.36** | **4168.45** |

२. उपरोक्त रू. ४१६८.४५ लक्ष (रु. एकेचाळीस कोटी अडुसष्ट लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) खर्च मागणी मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागसवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२) (४३) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य (केंद्र योजना), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२२५ E०३३) यामधील सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी तातडीने आहरीत करण्याची दक्षता घ्यावी व संबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास / प्रकल्प अधिकारी ,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प /योजना अंमलबजावणी करणारी यंत्रणा यांना वितरित करावा.

४. सन २०१८-१९ या वर्षामधील केंद्र शासनाकडुन संदर्भ क्र.१ कडील पत्रान्वये मंजुर योजनांपेकी अ.क्र.२,८,९,२३,३१ व ३२ वरील योजनांची मार्गदर्शक तत्वे शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आलेली आहेत. अ.क्र.४,५,७,१६,२५,२७ व २८ वरील योजनांची मार्गदर्शक तत्वे शासन/आयुक्तालय/आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांच्या स्तरावरुन निर्गमित करण्यात येतील. उर्वरित योजनांसाठी अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी यांनी शासन निर्णय दि.२२.१२.२०१७ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार संबधित संस्थेशी समन्वय साधुन योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सुचना निर्गमित करुन रुपरेषा तयार करणे, लाभार्थी निश्चित करणे,मुल्यमापन व आढ़ावा घेणे इ. बाबींसाठी कार्यपद्धती निश्चित करावी. या योजनांसाठी

प्रशासकीय मान्यता/मार्गदर्शक तत्वे निर्गमित करून योजनांची अंमलबजावणी तातडीने सुरु करण्याची जबाबदारी संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांची राहील.

५. केंद्र शासनाकडुन मंजुर सर्व योजनांचा मासिक प्रगती अहवाल संबंधित अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी यांच्याकडुन प्राप्त करुन घेवुन दरमहा १० तारखेच्या आत शासनास सादर करणे व कार्यान्वित असलेल्या योजनांसंदर्भात पुढील निधी संबंधितांना वितरित करण्यापुर्वी त्या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल व झालेल्या खर्चाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करुन घेण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील.

६. ज्या योजना संबंधित प्रकल्प अधिका-यांच्या कार्यक्षेत्रात राबविल्या जातील त्या योजनांच्या लाभार्थ्यांची यादी व Geotagged Photographs हे www.stcmis.gov.in /smis या वेबसाईट वर अपलोड करावेत. प्रकल्प राबविल्याबाबतचा आवश्यक दस्ताऐवज संबंधित प्रकल्प अधिका-यांमार्फत ठेवण्यात येवून तो योग्य प्रकारे जतन केला जाईल याची दक्षता संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्याकडून घेण्यात यावी व योजनांची कालबद्ध अंमलबजावणीची संपूर्ण जबाबदारी संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांची राहील.

७. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६२/अर्थोपाय, दिनांक ११/१०/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०५१२४९०१६७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh R Rajput

Digitally signed by Ajitsingh R Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a614ce75be611413980d3efebe7cde81ad571ab119e8360b7b526b5159edd099, serialNumber=32168d31c7d800af039db3657f6a01d233033f3f7c16b7ca135b2c868025eb3e, cn=Ajitsingh R Rajput
Date: 2018.11.05 12:56:40 +05'30'

(अ.रा.राजपूत)
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) सहसचिव /उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) अपर आयुक्त,आदिवासी विकास,ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.

१०) अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१३) नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अवर सचिव, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.